**अतिरिक्त सरकारी अभियोक्ता, गट अ संवर्गातील अभियोक्त्यांना सहाय्यक संचालक व सरकारी अभियोक्ता गट -अ या पदावर पदोन्नती देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- डीपीपी-१०१८/प्र.क्र.३४५/पोल-१०,**
दुसरा मजला, मंत्रालय, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १७ मार्च, २०२०

वाचा :-१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही-२०१८/प्र.क्र.१५९/ कार्यासन १२, दिनांक ०१.०८.२०१९
२) संचालक, अभियोग संचालनालय महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.सअपदो/१०८/१६९६/२०१८ दि. ७.८.२०१८ व दि. १९.३.२०१९

**शासन आदेश-**

संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या नियंत्रणाखालील अतिरिक्त सरकारी अभियोक्ता, गट- अ या संवर्गातील खाली नमूद केलेल्या अभियोक्त्यांना सहाय्यक संचालक व सरकारी अभियोक्ता गट-अ या संवर्गातील रू.एस २४ : ७११००-२११९०० वेतनश्रेणीतील पदावर खुल्या (अराखीव) प्रवर्गात प्रशासकीय हितास्तव व तात्पुरत्या स्वरूपात या आदेशान्वये पदोन्नती देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अतिरिक्त सरकारी अभियोक्त्यांचे नाव व प्रवर्ग | प्रवर्ग | सहाय्यक संचालक व सरकारी अभियोक्ता या पदावर पदस्थापनेसाठी मंजूर विभागीय संवर्ग |
|---|---|---|---|
| १. | श्री.बिपिन मोहनलाल शिंगाडा, खुला (अराखीव) | खुला (अराखीव) | नाशिक |
| २. | श्री.माधव गंगाराम पौळ, खुला (अराखीव) | खुला (अराखीव) | पुणे |
| ३. | श्री.राजाभाऊ गणपत कातकडे, (इ.मा.व) | खुला (अराखीव) | कोकण-२ |

वरील सरकारी अभियोक्त्यांची पदोन्नतीने नियुक्ती खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून करण्यात यावी.

१) वरील अभियोक्त्यांना सदर पदोन्नती तात्पुरत्या स्वरूपात असून महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येईल.

२) सदर पदोन्नती मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका २८३०६/२०१७ मधील वेळोवेळी होणाऱ्या निर्णयांच्या अधीन राहून देण्यात यावी, तसे नियुक्ती आदेशांत स्पष्ट नमूद करण्यात येईल.

३) सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा व सेवाज्येष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही.

४)प्रशासकीय गरजा विचारात घेऊन संबंधित जिल्ह्यातील कार्यभार व प्रलंबित प्रकरणे यांचा विचार करून संचालक, अभियोग संचालनालय यांनी संबंधित अभियोक्त्याच्या नावासमोर दर्शविलेल्या विभागीय संवर्गातील जिल्ह्यात पदस्थापना/ कार्यभार देण्याबाबतचे आदेश आपल्या स्तरावरून त्वरित निर्गमित करावे.

५)पदोन्नत झालेल्या अभियोक्त्यांनी त्यांच्या पदोन्नतीचे/पदस्थापनेचे आदेश प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून सात दिवसांच्या आत हजर होणे आवश्यक राहील. त्याप्रमाणे ते हजर झाले नाहीत तर त्यांना पदोन्नती नको, असे समजून शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र एसआरव्ही-१०८७/प्र.क्र.११३१/प्र.क्र.११/८९ कार्यासन १२ दि. ३०.४.१९९१ मधील तरतुदींनुसार त्यांना देण्यात आलेली पदोन्नती रद्द करण्यात येईल.

६) संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य यांनी पदोन्नत झालेल्या वरील अभियोक्त्यांना स्थानिक पर्यायी व्यवस्था करून तात्काळ कार्यमुक्त करावे आणि नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ हजर होण्यासाठी संबंधितांना सूचना द्याव्यात. तसेच संबंधित अधिकाऱ्यांनी पदभार स्वीकारल्यानंतर त्याचा अहवाल शासनास सादर करणे आवश्यक राहील.

७) पदोन्नत अभियोक्त्यांनी त्यांच्या नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रूजू व्हावे. त्यांनी अनधिकृतरित्या रजेवर जाऊ नये, यासंदर्भात त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक क्र. सीडीआर-१०८२/२५६७/२८/११, दि.३०.०८/१९८२ अन्वये दिलेल्या सूचनांकडे वेधण्यात येईल.

८) विभागीय संवर्ग वाटपानुसार पदोन्नतीने नियुक्त अधिकाऱ्याने किमान ३ वर्षे कालावधी त्या विभागीय संवर्गात पूर्ण करणे आवश्यक राहील.

९) याशिवाय नियुक्ती प्राधिकाऱ्यांस आवश्यक वाटतील अशा सेवाविषयक बाबींसंदर्भातील अटी

२. सदर शासन आदेश सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक. ३६ए/१६ब, दि.२१.०१.२०२० अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा संगणक संकेताक क्र. २०२००३१७१५५९३३३१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kishor Shyamrao Bhalerao

Digitally signed by Kishor Shyamrao Bhalerao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a9c66c37cf4df25ecf07a096af23d69cb2e83d31183e8f9d61db36e6ca846c9e, serialNumber=94524ab889e2fa9e6bfe5e1e58426881bc36b968ffd0f45ce2d4bd3ff527ded2, cn=Kishor Shyamrao Bhalerao
Date: 2020.03.17 16:01:59 +05'30'

**( किशोर भालेराव )**

**उप सचिव (विधि), गृह विभाग**

**प्रत,**

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.

२. संचालक, अभियोग संचालानालय, महाराष्ट्र, मुंबई.

३. सह सचिव / उप सचिव, समाजिक न्याय विभाग, मंत्रालय,मुंबई.

४. सह सचिव / उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (सेवा), मंत्रालय, मुंबई.

५. महालेखापाल१/२ (लेखा व अनुज्ञेयात/लेखा परिक्षा ) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे स्वीय सहाय्यक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. अपर मुख्य सचिव (अ. व सु.) यांचे स्वीय सहाय्यक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. कार्यासन १२/१६ ब, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवड नस्ती, पोल-१०.